(४)

राजपत्रित शासकीय अधिका-यांची
राज्यांतर्गत स्वीयेतर सेवेत बदली
करण्याचे अधिकार.

---

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-स्वीयेसे-१०८५/८५३/सेवा-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १८ जुलै १९८५.

## शासन निर्णय

महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने] नियम १९८१ मधील नियम ३६[२] व परिशिष्ट-एक, अनुक्रमांक २[एक] च्या तरतुदीनुसार, राजपत्रित अधिका-यांची परिशिष्ट-दोन मध्ये उल्लेखिलेल्या प्रमाणे अटींवर आणि शर्तींवर राज्यांतर्गत स्वीयेतर सेवेत बदली करण्याचे अधिकार, मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. तथापि हे अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सामान्य प्रशासन विभागाशी विचार विनिमय करूनच वापरावयाचे आहेत.

२. राजपत्रित अधिका-यांची राज्यांतर्गत स्वीयेतर सेवेत बदली करण्याचे संपूर्ण अधिकार मंत्रालयीन विभागांना प्रदान करण्याविषयीचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. शासन असा निदेश देत आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने] नियम १९८१ मधील परिशिष्ट-तीनच्या मार्गदर्शक सूचनांशी अधीन राहून, परिशिष्ट-दोन मध्ये उल्लेखिलेल्या प्रमाणे अटींवर आणि शर्तींवर, राजपत्रित अधिका-यांची राज्यांतर्गत स्वीयेतर सेवेत बदली करण्याचे संपूर्ण अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात यावेत.

३. हे आदेश दिनांक १ जुलै १९८५ पासून अमलात येतील.

४. महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने] नियम, १९८१ मधील या संबंधीच्या विद्यमान तरतुदींमध्ये या शासन निर्णयाच्या तरतुदीपुरती सुधारणा करण्यात आली आहे असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमांत यथावकाश रितसर सुधारणा करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

व्यं. दे. पानसे,
शासनाचे सह सचिव.

कृ.मा.प.

शासमु-रोटा/वि.वि./एफ-३२५[३५००-१०-७-८५]

प्रत रवाना :-

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) राज्यपालांचे सचिव,
९) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
११) मंत्रालयातील सर्व विभाग,
१२) सर्व विभागीय आयुक्त,
१३) मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख,
x १४) प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x १५) प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x १६) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
x १७) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
x १८) प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१९) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२०) जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
२१) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
२२) निवड फाईल, कार्यासन सेवा-८.

x पत्राद्वारे

१९८५ चा क्रमांक

---

एच-३२५(३५००-१७-७-८५).